**<u>कोव्हीड-१९ विषाणुचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी करावयाच्या विविध उपाययोजनांसाठी पुणे विभागास निधी वितरित करण्याबाबत.....</u>**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सीएलएस-२०२०/प्र.क्र.२५४/म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०९ ऑक्टोबर, २०२०

**<u>संदर्भ</u>** : १) केंद्र शासन,गृह मंत्रालय,यांचे पत्र क्र. ३३-४/२०२०-NDM-I, दिनांक १४ मार्च, २०२०
२) केंद्र शासन,गृह मंत्रालय,यांचे पत्र क्र. ३३-४/२०२०-NDM-I, दिनांक २८ मार्च, २०२०
३) शासन निर्णय, समक्रमांक, दि. १६.३.२०२० , दि. २८.३.२०२०, दि. ०३.४.२०२०, दि. २१.४.२०२०, दि. २९.५.२०२० व दिनांक २५.६.२०२०
४) शासन निर्णय,क्रमांक :सीएलएस-२०२०/प्र.क्र.१९८/म-३,दि.२७.७.२०२० व दि.२९.७.२०२०
५) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांचे पत्र क्रमांक: संआसे/सहसंचालक कक्ष /८८/२०२०, दि.२८.०९.२०२०

**<u>प्रस्तावना</u>**:

राज्यामध्ये कोव्हीड-१९ विषाणुचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी करावयाच्या विविध उपाययोजना करण्यासाठी राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून निधी मागणीसाठी विभागीय आयुक्तांकडून प्राप्त होणारे प्रस्तावांची छाननी करण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये आंतर विभागीय छाननी समिती गठीत करण्यात आली आहे. सदर आंतर विभागीय छाननी समितीने पुणे विभागांकडून राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून निधी मागणीसाठी प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करून त्यांच्या शिफारशी संदर्भाधीन क्रमांक ५ येथील पत्रान्वये शासनास पाठविले आहे. आंतर विभागीय छाननी समितीकडून प्राप्त झालेल्या शिफारशींवर निर्णय घेण्यासाठी राज्य कार्यकारी समितीची बैठक दिनांक ०१.१०.२०२० रोजी आयोजित करण्यात आली होती. त्यानुसार राज्य कार्यकारी समितीने दिनांक ०१.१०.२०२० रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार पुणे विभागास कोव्हीड-१९ संदर्भातील विविध उपाययोजना करण्यासाठ निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>**:

राज्यामध्ये कोव्हीड-१९ विषाणुचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी विविध उपाययोजना करण्यासाठी आंतर विभागीय छाननी समितीकडून प्राप्त झालेल्या शिफारशींवर राज्य कार्यकारी समितीने दिनांक ०१.१०.२०२० रोजी झालेल्या बैठकीत दिलेल्या मंजूरीनुसार राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून एकूण रूपये १५१,४६,७२,०००/- (रूपये एकशे एकावण्ण कोटी शेहचाळीस लाख बहात्तर हजार फक्त) इतका निधी विभागीय आयुक्त, पुणे यांना वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या शासन निर्णयाव्दारे वितरीत करण्यात येत असलेल्या निधीचा विनियोग खालील बाबींपैकी आंतरविभागीय छाननी समितीने पुणे महसुल विभागातील संबंधित अधिकाऱ्यांशी व उपायुक्त (महसुल) यांच्यासोबत घेतलेल्या दुरचित्रवाणीव्दारे घेण्यात आलेल्या बैठकीत मान्य केलेल्या बाबींवर व आंतर विभागीय छाननी समितीने विहित केलेल्या मर्यादेत खर्च करण्यात यावा:

1. **<u>Measures for quarantine sample collection and screening</u>** :

(a) Provision for temporary accommodation, food, clothing, medical care, etc. for people affected and sheltered in quarantine camps (other than home quarantine) or for cluster containment operations.

(b) Cost of consumables for sample collection.

(c) Support for checking screening and contact tracing.

2. **<u>Procurement of essential equipment's/labs for response to COVID-19</u>**:

(a) Cost of setting up additional testing laboratories within the Government and the cost of consumable and testing kit.

(b) Cost of personal protection equipment for healthcare, municipal, police and fire authorities.

(c) Cost of Thermal Scanners, Ventilators, Air Purifiers, Oxygen generation and storage plant in hospitals, strengthening ambulance services for transport of patients, setting up containment zones, Covid-19 hospital, Covid-19 care centers and consumables in the Government hospitals.

२. राज्य कार्यकारी समितीने घेतलेल्या निर्णयानुसार खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विभागीय आयुक्त, पुणे यांना रू. १५१,४६,७२,०००/- (रूपये एकशे एकावण्ण कोटी शेहचाळीस लाख बहात्तर हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | जिल्हा | मंजूर करण्यात येत असलेला निधी (रक्कम रुपयात) |
|---|---|---|
| १. | पुणे | २७,२७,४९,०००.०० |
| २. | कोल्हापूर | २५,०९,६९,०००.०० |
| ३. | सातारा | ४५,५९,०२,०००.०० |
| ४. | सांगली | १७,६७,००,०००.०० |
| ५. | सोलापूर | ३५,८३,५२,०००.०० |
| **एकूण पुणे विभाग** | | **१५१,४६,७२,०००.००** |

उपरोक्त प्रमाणे मंजूर केलेला निधी बीम्स प्रणालीवर विभागीय आयुक्त, पुणे यांना कार्यासन म-११ यांनी वितरित करावा.

३. आंतर विभागीय छाननी समितीने विभागनिहाय घेतलेल्या दुरचित्रवाणी बैठकीत मान्य केलेल्या बाबींवर त्यांनी विहित केलेल्या मर्यादेत खर्च करण्यात यावा. कोव्हीड-१९ चा प्रादुर्भाव रोखण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांचा खर्च राष्ट्रीय आरोग्य अभियानामधून देखील करण्यात यावा. मात्र वर मंजूर केलेला निधी खर्च करताना राज्य शासनाच्या इतर विभागाच्या योजनांमधून किंवा राष्ट्रीय आरोग्य अभियानामधून त्याच बाबींवर खर्चाची व्दिरूक्ती होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी.

४. सदर निधी खर्च करताना खालील अटी व शर्तीचे विशेषत्वाने पालन करण्यात यावे :

१) कोव्हिड -१९ विषाणूचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी अन्य योजनातून सदर बाबी प्रस्तावित केलेल्या नाहीत याबाबत संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाने खात्री करणे बंधनकारक राहील जेणे करुन द्विरुक्ति होणार नाही.

२) आवश्यक तेथे प्रशासकीय, तांत्रिक मान्यता व निविदा प्रक्रिया राबविण्याची दक्षता घ्यावी.

३) आवश्यक तेथे निविदा मागविणे, स्वीकृती करणे व खरेदी बाबीचे सर्व निकष शासनाच्या त्या त्या वेळेच्या प्रचलित कार्यपध्दती व धोरणा नुसार राहतील या बाबत दक्षता घेण्यात यावी.

४) RT-PCR किट्सचा पुरवठा राज्य स्तरावरुन वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागा मार्फत करण्यात येणार आहे. अधिक आवश्यकतेसाठी बाजार भावानुसार खरेदी करताना RT-PCR किट्स व VTM किट्स यांचे हॉफकिन बायोफार्मा लिमिटेड यांनी निश्चित केलेल दर विचारात घेवून न्युनतम दराने खरेदी करण्यात यावी. तसेच औषधे व साहित्य सामुग्री स्थानिक पातळीवर खरेदी करताना निविदे नुसार प्राप्त झालेल्या दरासोबत हाफकिन कडील दर, इतर उपलब्ध दर यांची तुलना करुन न्युनतम दराने खरेदी करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५) खरेदी करतांना विभागातील सर्व जिल्हयासाठी दर सर्वसाधारण समांतर असतील याची दक्षता घ्यावी.

६) Covid Medicine / Lab kits - RT-PCR Kit / Rapid Antigen / Antibody या बाबींसाठी नविन पुरवठा धारक/ उत्पादक उपलब्ध होत आहेत. त्या मुळे प्रत्येक वेळी खरेदी करतांना याची माहिती घेऊनच खरेदी करावी. नवीन पुरवठा धारक उपलब्ध होत असल्यामुळे बाजारभाव कमी होत आहेत. त्यामुळे एकाच वेळी मोठी खरेदी करण्यात येऊ नये.

७) Tocilizumab हे औषध सर्व जिल्हयांनी मागितलेले आहे. मात्र याबाबत उत्पादकांनी हे औषध परिणामकारक नाही असे नमुद केलेले आहे. त्यामुळे याबाबत राज्य तज्ञ समितीच्या मार्गदर्शक तत्वांच्या अधिन खरेदी करण्यात यावी.

८) मागणी केलेल्या काही बाबी या आवश्यकते पेक्षा काही प्रमाणात जास्त वाटत असल्याचे आंतर विभागीय छाननी समितीने नमूद केले आहे. अशा वस्तुंबाबत जिल्हा प्रशासनाने प्रत्यक्ष आवश्यकता व उपयोगिता तसेच मनुष्यबळाची उपलब्धतता या बाबी पुनश्चः खरेदीच्या वेळी पडताळणी करण्याची दक्षता घ्यावी.

९) Antigen/ Remdesivir / Flavipiravir / N95 यांची खरेदी कमी प्रमाणात व कमी कालावधीसाठी करणे आवश्यक आहे. शक्यतो १५ ते २० दिवसांची खरेदी करण्यात यावी. दर निश्चिती झालेली असली तरी प्रत्येक वेळी दराबाबत पडताळणी करावी. मोठी ऑर्डर दिल्यास कमी होणा-या दराचा फायदा खरेदी विभागास मिळावा अशा प्रकारची अट खरेदी आदेशात अंतर्भूत करणे आवश्यक राहिल.

१०) Temporary Facility निर्माण करतांना रुग्ण संख्या व Daily Case Load बघणे आवश्यक आहे. शक्यतो उपलब्ध शासकीय संस्था किंवा शासकीय इमारत यांच्या उपलब्ध इमारतीत बदल करुन तयारी करण्यात यावी. जिल्हयातील उपलब्ध शासकिय खाटा, खाजगी रुग्णालयातील ८० टक्के उपलब्ध खाटा आणि खोल्या यांची संख्या लक्षात घेऊनच नवीन Temporary Centres तयार करावेत.

११) कार्यरत केलेले CCC किमान ७५ टक्के भरल्यानंतरच नवीन CCC कार्यान्वित करण्याचा विचार करावा.

१२) प्रक्षेपित प्रकरणे (Projected Cases) आणि $O_2$ Bed ची उपलब्ध संख्या यावर Liquid $O_2$ tank ची आवश्यकता अवलंबुन राहील. खरेदी करतांना याची पडताळणी करुनच खरेदी करावी. शक्यतो शासकिय / नगरपालिका / महानगरपालिका यांच्यासाठी Liquid $O_2$ tank ची खरेदी करावी. खाजगी किंवा तात्पुरता निर्माण करण्यात येणा-या सुविधांमध्ये शक्यतो Dura cylinders / Jumbo cylinders यांचा वापर करावा.

१३) मनुष्यबळ भरताना काळजी घेणे आवश्यक आहे. सर्व संस्थासाठी सरसकट मनुष्यबळ देण्यात येऊ नये. रुग्ण नसतांना CCC/ DCHC कार्यान्वित करुन १०० टक्के लागणारे मनुष्यबळ भरण्यात येऊ नये. जुने CCC / DCHC ७५ टक्के भरल्यानंतरच पुढील संस्था सुरु कराव्यात व त्यानुसार मनुष्यबळ भरण्यात यावे.

१४) Trunat / CBNAT नवीन मशीन घेतांना राष्ट्रीय क्षयरोग कार्यक्रमा अंतर्गत प्राप्त Trunat / CBNAT पुर्ण क्षमतेने वापरण्यात येत आहेत याची खात्री करावी.

१५) वैद्यकीय उपकरणे व साहित्य सामुग्री खरेदी उर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय दि. ०१.१२.२०१६ व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणा मधील अटी व शर्तींच्या अधिन राहुन तसेच सार्वजनिक आरोग्य विभागाचे पत्र क्रमांक जिवायो-२०१८/प्र.क्र. ३२२/आरोग्य-८, दि. ३०.१.२०१९, सार्वजनिक आरोग्य विभागाचे पत्र क्रमांक खरेदी-२०१८/प्र.क्र. २४०/आरोग्य-८, दि. २८.२.२०१९ व क्रमांक: खरेदी-२०१८/प्र.क्र.९४/आरोग्य-८ दि. २९.६.२०१९ मधील मार्गदर्शक सुचना नुसार कार्यवाही करण्यात यावी.

१६) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक करोना-२०२०/प्र.क्र.५८/आरोग्य-५, दि. २४/०३/२०२० अन्वये कोव्हिड -१९ कालावधीत जिल्हा स्तरावर उपलब्ध अनुदानातुन खरेदी करण्याकरिता जिल्हाधिका-याच्या अध्यक्षतेखालील समितीस अधिकार प्रदान करण्यात आले असल्याने त्यांच्या मान्यतेने जिल्हा स्तरावरील खरेदीची कार्यवाही करण्यात यावी. ज्या बाबींची राज्य स्तरावरुन खरेदी करण्यात येते त्या बाबींची राज्य स्तरावरुन खरेदी करून होत असलेल्या पुरवठयाचा विचार करुनच खरेदीची आवश्यकता निश्चित करावी. सदर खरेदी करतांना बाजार भावाचा विचार करुनच खरेदी करण्यात यावी. सदर बाबी खरेदी करताना विहीत नियमांचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच खरेदी बाबत या आयुक्तालयाकडुन व शासनाकडुन वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या सुचना व मार्गदर्शक तत्त्वे यांचे पालन करावे.

१७) वरील प्रमाणे बाबी खरेदी करतांना त्यासाठी असणा-या तांत्रिक विनिर्देशाप्रमाणे ती असल्याची खात्री करावी. खरेदीची कार्यवाही प्राप्त अनुदान मर्यादेतच करण्यात यावी. आवश्यकतेनुसारच खरेदी करण्यात यावी. औषधे , पुरवठा व साहित्य विनावापर पडुन राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी.

५. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन क्रमांक ३ येथील विविध शासन निर्णयातील सुचनांचे पालन करण्यात यावे. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा.

६. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. तसेच राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त,पुणे यांची राहील.

७. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी अर्थसहाय, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार

खर्च, (९१) (०२) कोव्हीड-१९ चा प्रादुर्भाव रोखण्यावरील खर्च (अनिवार्य), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ ४१४१) या लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजनेव्दारे उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : २१७/व्यय-९/२०२०, दिनांक ०६.१०.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२०१००९१५४६१८६९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032,
street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=9ce356f38c6a70a8ffde299ad6627f48bd01e875a7aca38bd139b0cc5367e62d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2020.10.09 15:47:57 +05'30'

**( उदय गवस )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/विधान परिषद), विधानमंडळ सचिवालय,मुंबई,
४. महाराष्ट्र विधानमंडळाचे सर्व सन्माननीय विधान सभा/विधान परिषद सदस्य,
५. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
६. प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग ),जी.टी.हॉस्पीटल, मुंबई,
७. आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. विभागीय आयुक्त, पुणे
९. जिल्हाधिकारी, पुणे/सातारा/सांगली/कोल्हापूर/सोलापूर
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१२. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सातारा/सांगली/कोल्हापूर/सोलापूर
१४. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१५. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१६. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१७. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१८. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१९. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ ).